**मौजे विष्णूपुरी ता.जि. नांदेड येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या सुधारीत अंदाजपत्रकास शासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः पापुयो - २०१८/प्र.क्र.२०६/पापु १८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: १३ डिसेंबर, २०१८

वाचा-

१) ग्रामपंचायत विष्णूपुरी ता.जि. नांदेड यांचे मूळ अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यतेचा ठराव क्र.१७, दि. १८/१२/२०१४.

२) अधिक्षक अभियंता, विभागीय भारत निर्माण कक्ष, औरंगाबाद यांचे मूळ तांत्रिक मान्यता पत्र क्र.६१५ दिनांक १६/१२/२०१४

३) ग्राम पंचायत, विष्णूपुरी ता.जि. नांदेड यांचा सुधारीत योजना करणेबाबत ठराव क्र.९ दिनांक १६/०८/२०१८

४) कार्यकारी अभिंयता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, नांदेड यांची सदर प्रस्तावास दिलेली सुधारीत तांत्रिक संमती.

५) कार्यकारी अभिंयता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, नांदेड पत्रजा.क्र./जिपनां/ ग्रापापूवि/TB/२०१८-२०१९/कृ.१९६५,दिनांक १४/०८/२०१८.

प्रस्तावना:-

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमातंर्गत मौजे. विष्णूपुरी ता.जि. नांदेड येथील नळ पाणी पुरवठा योजनेस ग्रामपंचायत, मौजे विष्णूपुरी ता.जि. नांदेड यांनी संदर्भ क्र.१ येथील ठरावान्वये मूळ प्रशासकीय मान्यता प्रदान केली आहे. सदर योजनेच्या रु.३,०९,१५,१००/-(ढोबळ) किमतीच्या अंदाजपत्रकास अधिक्षक अभियंता, विभागीय भारत निर्माण कक्ष, औरंगाबाद यांनी संदर्भीय क्र.२ अन्वये मूळ तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. तथापी सदर योजनेच्या कामात वाढ झाल्यामुळे योजनेच्या खर्चात वाढ झाली. त्यानुषंगाने, ग्रामपंचायत मौजे विष्णूपुरी ता.जि. नांदेड यांनी संदर्भ क्र.३ अन्वये योजना सुधारित करण्याबाबत ठराव करण्यात आला आहे. त्यानुसार कार्यकारी अभिंयता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, नांदेड यांनी संदर्भ क्र.४ अन्वये प्रस्तुत योजनेच्या रु.३,३८,७९,४१०/-(ढोबळ) किमंतीच्या प्रस्तावास सुधारित तांत्रिक संमती प्रदान केली.परिणामी कार्यकारी अभिंयता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, नांदेड यांनी प्रस्तुत नळ पाणी पुरवठा योजनेच्या आराखड्यास व अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव संदर्भाधिन पत्र क्र.५ अन्वये शासनास सादर केला होता. तद्नुषंगाने प्रस्तुत योजनेच्या आराखड्यास व अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:-**

मौजे. विष्णूपुरी ता.जि. नांदेड या नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु. ३,२२,९४,१००./- (ढोबळ) (अक्षरी रुपये तीन कोटी बावीस लक्ष चौऱ्यांण्णव हजार शंभर फक्त) एवढ्या सुधारित किंमतीच्या अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधिन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**अटी**

१. सदर योजनेच्या मंजुर करण्यात येत असलेल्या सुधारित (ढोबळ) किमतीच्या अंदाजपत्रकास सक्षम प्राधिका-याकडून तांत्रिक मान्यता घेण्यात यावी.
२. या योजनेस सहमती दिलेल्या मूळ प्रशासकीय मान्यतेच्या तसेच सुधारीत तांत्रिक मान्यता देताना नमूद केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.
३. ही योजना पूर्ण झाल्यावर ती संबंधित ग्रामपंचायतीच्या ताब्यात देण्यात यावी. संबंधित कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, नांदेड यांच्याकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे, या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यास संबंधीत ग्रामपंचायत/जिल्हा परिषद जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच संबंधित कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद व संबंधित ग्रामपंचायतीचे अधिकारी व कंत्राटदार यांनी योजनेची संयुक्तपणे पाहणी आयोजित करावी आणि अशा पाहणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.
४. ही योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) या साठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी, योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/ जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही.
५. सदर योजनेची कामे पूर्ण झालेली असल्याने, योजनेची चाचणी घेतल्यानंतर योजना स्थानिक स्वराज्य संस्थेकडे (संबधित ग्रामपंचायत/जिल्हा परिषद) योजना हंस्तातरित करुन, योजनेचे लेखे बंद करण्यात यावेत.
६. हगणदारीबाबतच्या प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.
७. तांत्रिक फेरबदलाप्रमाणे सुधारित योजनेची उर्वरित कामे करणे संबंधित ठेकेदाराला बंधनकारक राहील.
८. प्रस्तुत योजना कोणत्याही परिस्थितीत पुनर्सुधारीत केली जाणार नाही याची जबाबदारी जिल्हा परिषदेची राहील.

२. या योजनेच्या सुधारित किंमतीतील वाढीव खर्च **रु.१३,७९,०३७./- (ढोबळ) (अक्षरी रुपये तेरा लाख एकोणऐंशी हजार सदत्तीस फक्त)** हा राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमा खालील राज्य हिश्श्यातून /जिल्हा नियोजन मंडळाकडून/किमान गरजा कार्यक्रमांतर्गत उपलब्ध होणा-या निधीतून करण्यात यावा.

३. प्रस्तुत योजनेस सुधारीत प्रशासकीय मान्यता ही वित्त विभागाच्या दिनांक १७/०४/२०१५ च्या क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२ या शासन निर्णयातील भाग पहिला, उपविभाग-३ मधील अ.क्र.६(सहा) परिच्छेद क्र.२७ (अ) अनुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार देण्यात येत आहेत.

४.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२१३१५५७४३८९२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh Sawairam Rathod

Digitally signed by Suresh Sawairam Rathod
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e695ebef4b8a6c860bec48f3ef34f42f0c13f8d1aa06f854d5b9bd6874084124, serialNumber=bcaaf1242528ff3cdece2c8eb03929321c1c09c0a7c4d906e3b8a47677ad9769, cn=Suresh Sawairam Rathod
Date: 2018.12.13 16:04:55 +05'30'

**( सु.स. राठोड )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.
२) मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता.
३) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/ विधान परिषद.
४) मा. विधानमंडळ सदस्य (सर्व)
५) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नांदेड.
७) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर.
८) महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १, मुंबई
९) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था(वासो), बेलापूर, नवी मुंबई.
१०) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, औरंगाबाद
११) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नांदेड.
१२) संचालक(वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर,नवी मुंबई.
१३) उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, औरंगाबाद
१४) वरिष्ट भुवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, औरंगाबाद
१५) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, नांदेड
१६) अतिरिक्त मुख्य सचिव, नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१७) अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१८) प्रधान सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१९) मु.अ. तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
२०) कार्यासने (पापु-०४, ०६,०७,०९,१०,१३,१७ व २०), पा. पु. व स्व. वि.,मंत्रालय,मुंबई-३२
२१) निवड नस्ती कार्यासन पापु-१८.